**हरणबारी मध्यम प्रकल्प, ता.बागलाण (सटाणा), जि.नाशिक या प्रकल्पांतर्गत जायखेडा बंधारा फड कालवा साखळी क्र. ७९१ ते १२०० मीटरमध्ये बंदिस्त पाईप टाकणे या विशेष दुरूस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रमा-२०१७/ (प्र.क्र. ५५८/२०१७)/ सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २६ सप्टेंबर, २०१८.

वाचा :- १. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र. गोमपाविम/सिंचन-१/धा.क्र.१९,३०/७५३८ , दि.१६/०८/२०१८.
२. शासन निर्णय - संकीर्ण-२०१६/(२७/२०१६)/लपा-२ , दि.२६.०५.२०१७.

प्रस्तावना :-

हरणबारी मध्यम प्रकल्पांतर्गत मोसम नदीवर सोमपूर गावाजवळील ब्रिटीश कालीन बंधाऱ्यापासून जायखेडा बंधारा कालवा निघालेला असून कालव्याची एकूण लांबी ६ किमी असून वहन क्षमता २०.०० घ.फूट / सेकंद इतकी आहे. या कालव्यावर जायखेडा शिवारातील १४० हेक्टर सिंचन क्षेत्र येते.जायखेडा बंधारा सन २००५ मध्ये पुरामुळे तुटला होता. त्याचे काम सन २०१० मध्ये पूर्ण झाले, त्यानंतर कालव्यातून सिंचनासाठी नियमित पाणी देण्यात येत आहे. कालव्याचे दुरुस्तीचे कामे करीत असता सोमपूर गावाजवळ कालवा सा.क्र.७८० मी.ते १२०० मी. मध्ये कालव्यात मोठ्या प्रमाणात गाळ / माती साचलेली आढळून आली. सदर कालवा लांबीत कालव्याच्या उजव्या बाजूस सोमपूर गावाची उंची गढी ( ५ ते ३० मी.) पर्यंत असून पावसाळ्यात गावाचे सांडपाणी/ गाळ वाहून कालव्यात जमा होतो. त्यामुळे कालवा गाळाने भरला जातो. ही अडचण नेहमी येणार असल्याने कालवा सुरक्षिततेच्या दृष्टीने व कालवा नियमित होण्यासाठी सा.क्र. ७९१ ते १२०० मी. दरम्यान बंदिस्त पाईप लाईन करण्याचे काम प्रस्तावित करण्यात आलेले आहे. सदर कामाची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापरसंस्थेने व लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. या अनुषंगाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर कामाकरीता विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

**हरणबारी मध्यम प्रकल्प, ता.बागलाण (सटाणा), जि.नाशिक या प्रकल्पांतर्गत जायखेडा बंधारा फड कालवा साखळी क्र. ७९१ ते १२०० मीटरमध्ये बंदिस्त पाईप** टाकण्याच्या विशेष दुरूस्ती कामास विस्तार व सुधारणा अंतर्गत रु.३६,९७,६८४/-, ३% अनुषंगिक खर्च रु.१,१०,९३०.५२/- , १% W.C. रु.३६,९७६.८४/- , १२% GST excluding cost of Royality रु.

४,०६,२८४.१३/- अशा एकूण रु.४२,५१,८७५/- (रू.बेचाळीस लक्ष एकावन्न हजार आठशे पंच्च्याहत्तर फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या आधिकारान्वये व आं.वि.स. व उ.स. यांच्या सहमतीने खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), ०१.०१.२०१५ मधील मागदर्शक सूचनांचे पालन करणे अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२ शासन परिपत्रक क्र. सिंचन -२०१५/प्र.क्र.२४/(भाग-२)/२०१५/जसं(धोरण), दि.०२/०२/२०१७ मधील मागदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी.

३. शासन पत्र दि.०४/०६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसार २ % मर्यादेत निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे दोन वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. सदर कामास प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतर सविस्तर संकल्पन करुनच तांत्रिक देण्यात यावेत, तसेच प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच्या आत अंदाजपत्रकाची किंमत राहावी व याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

५. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

६. प्रकल्पावरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे, कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे याची जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

७. माती कामे व गवत झाडे / झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत.

८. प्रस्तावीत कामांमुळे खोदकाम/ तोडफोड उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

९. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

१०. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करुन द्यावे.

११. विषयांकित अंदाजपत्रकातील तरतूदी, दर, वहनअंतर व तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (१२) उर्वरित महाराष्ट्र, (१२) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १९४) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि.२६/०५/२०१७ मध्ये विहित केल्यानुसार कामांच्या खर्चाबाबतीत रू. ५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार आं.वि.स व उ.स. यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवही क्र.६ सन २०१८-१९ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२६१६४७५०२०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.09.26 16:52:40 +05'30'

**( अ.अ. कपोले )**
**शासनाचे उप सचिव**

**सोबतः परिशिष्ट-अ**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद , मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
१४) मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक,
१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई ,
१६) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक,
१७) कार्यकारी अभियंता, मालेगांव पाटबंधारे विभाग, नाशिक,
१८) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१७/(प्र.क्र. ५५८ /२०१७)/ सिं.व्य.(कामे),दि.२६/०९/२०१८ चे सहपत्र**

परिशिष्ट - अ

| Sr.No. | Name of Work | Estimate Cost |
|---|---|---|
| **1** | **2** | 3 |
| 1 | Estimate Amount for providing and laying of R.C.C pipe line from ch .791 to 1200 meter | 36,97,684.00 |
| 2 | Add 3 % Contingency on Estimated Cost | 1,10,930.52 |
| **3** | Add 1 % Establishment on Estimated Cost | 36,976.84 |
| 4 | Add 12 % for GST (Excluding cost of Royalty) | 4,06,284.13 |
| | **(3661073.82-275372.72)= 3385701.10** | |
| | **Total Rs.** | 42,51,875.49 |
| | **Say Rs.** | 42,51,875.00 |

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.09.26 16:55:30 +05'30'

(अ.अ.कपोले)
शासनाचे उप सचिव